नवनाथ भक्तिसार- अध्याय पहिला

ही कथा द्वापारयुगाचा अस्त समीप आला आहे, अशावेळी आकार घेत होती कलियुगाच्या प्रारंभापुर्वीच पुढे घडणाऱ्या अनिष्ट घटना आणि त्याचे पृथ्वीतलावर होणारे दुष्परिणाम, मनुष्यजन्माची होणारी श्रेधा यांची जाणीव झालेल्या देवाधीदेव रमापती श्रीविष्णूने श्रीकृष्णरुपात या नवनारायणांना आमंत्रित केले, आणि त्या अनुषंगाने हे नवनारायण श्रीकृष्णाच्या भेटीसाठी द्वारका नगरीत आले. श्रीमद् भागवत ग्रंथामध्ये या नवनारायणांचा उल्लेख आहे. हे नवनारायण म्हणजे ऋषभ देवांच्या शतपुत्रापैकी देवांचे नऊ श्रेष्ठ भक्त. त्या महान ऋषींची नावे कविनारायण, हरिनारायण, अंतरीक्ष नारायण, प्रबुद्ध नारायण, पिप्पलायन नारायण, अविर्होत्र नारायण, द्रुमिल नारायण, चमस नारायण आणि करभाजन नारायण, अशी आहेत. हे नारायणाचेच कार्य करतात, म्हणून त्यांचा उल्लेख ही नारायण असा होत असे. रमारमण श्रीविष्णुचा पूर्णावतार म्हणजे भगवान श्रीकृष्णाच्या खास आमंत्रणावरून हे स्वर्गस्थ नवनारायण द्वारकेत पृथ्वीलोकात आले आहेत. त्यावेळी यादवांच्या सभेत श्रीकृष्ण सिंहासनावर बसले आहेत आणि त्यांचा परमभक्त उद्धवसुद्धा शेजारील आसनावर स्थानापन्न झाला आहे. श्रीकृष्णाने नवनारायणांच्या आगमनाबद्दल आनंद व्यक्त केला आणि त्यांना आसनस्थ केले. परिवारासह सर्वांनी त्या दिव्यरुपातील नवनारायणांची षोडशोपचारे पूजा केली. एकमेकांचे क्षेमकुशल विचारणा झाल्यावर या नवनारायणांनी आम्हास कोणत्या महत्वाच्या कामासाठी आपण बोलावले आहे अशी नम्रतेने विचारणा केली. त्यावर भगवंत म्हणाले, "तुम्हा नारायणासमवेत पुनश्च पृथ्वीलोकांत अवतारीत व्हावे असे वाटते. कारण तुमच्या माझ्या एकत्रित प्रकटीकरणाने जे काही अभिसरण पृथ्वीतलावर होणार आहे, त्याचे दूरगामी परिणाम निश्चितच कल्याणकारीच होणार यात संदेह नाही. केवळ याच कारणासाठी मी तुम्हाला आमंत्रित केले आहे".

श्रीकृष्णाच्या या प्रस्तावावर अनुमोदन देताना हे नवनारायण भगवंतास म्हणाले, "आम्ही सहर्ष तयार आहोत, पण कोणते नामाभिधान धारण करावयाचे आणि अवतार कार्य करण्यासाठी कोणत्या स्थानी कोणत्या रुपात आम्ही प्रकट व्हावयाचे?"

त्यावर श्रीकृष्ण म्हणाले, "कवी नारायणांनी मच्छिंद्र नावाने जगात कार्य करावे, हरीनारायणांने त्यांचे शिष्यत्व स्वीकारून गोरक्ष नावाने त्यांचे शिष्यत्व पत्करावे अंतरीक्ष नारायणांनी जालंदर व्हावे, आणि प्रबुद्ध नारायणांनी त्यांचा शिष्य कानिफ व्हावे पिप्पलायन नारायणांनी चर्पट, अविर्होत्र नारायण हे वटसिद्ध नागनाथ, द्रुमिल हे भर्तरी करभाजन गहिनी होईल. आता ह्या नवनारायणांच्या अर्थातच नानाथांच्या प्रगटीकरणा बरोबरच पृथ्वीतलावरील अमंगल आणि आरिष्ट दूर करण्याच्या उद्देशाने अनेक महात्मे अवतीर्ण होऊन तुम्हास मोलाची मदत करणार आहेत. हे सारे अशासाठी की कलीचा प्रादुर्भाव आणि उपद्रवमूल्य सामान्यजनांना जाणवू नये. त्यासाठी महाकवी वाल्मिकी मानवयोनीत तुलसीदास म्हणून अवतरेल. ज्याच्या वैराग्याचा गौरव त्रिखंडात होत आहे, ते शुक्र महाराज भक्त कबीर म्हणून जन्मणार आहेत. महाभारत या महाकाव्याचे सर्वेसर्वा महर्षी व्यास हे जयदेवाच्या स्वरूपात अवतारणार आहेत. माझा परमभक्त जांबुवंत संत नरहरी सोनाराच्या रूपाने पुनर्जन्म घेणार आहे. माझा बंधू बलराम हा भक्त पुंडलिक होईल. इतकेच नव्हे तर मी स्वतः ज्ञानेश्वर म्हणून जन्म घेणार असून शुभ्रदेहधारी आणि सदासतेज पंचानन हा निवृत्तीच्या म्हणजे माझ्या वडील बंधूच्या आणि साक्षात गुरूच्या रुपात जन्म घेणार आहे. त्याचबरोबर चतुरानन विश्वनिर्मिता ब्रह्मदेव माझा लहान भाऊ सोपान आणि योगमाया साक्षात माझी बहीण मुक्ताबाई भिलोकी अवतारणार

आहे. या व्यतिरिक्त रामभक्त हनुमान हा पुनर्जन्मातही समर्थ रामदास रुपात प्रखर रामभक्तीची अनुभूती देणार आहे आणि विधीलिखिताप्रमाणे प्रभू रामचंद्राच्या वनवासास कारण ठरलेली दशरथराजाच्या पत्नीची सेवा करणारी कुब्जा नामक दासी संत जनाबाईच्या रुपात अवतारणार आहे. अशा प्रकारे राजहंसाच्या थाव्याप्रमाणे आपण सार्वजण एकत्रितपणे पृथ्वीतलावार अवतारणार आहोत. या अवतारकार्यात केवळ कलियुगातील दाहकतेची धग कमी करण्यासाठी आणि भक्ती महात्म्य वाढविण्यासाठी माझी ही योजना आहे आणि तुमच्या सहकार्याने ती कार्यान्वित होणार आहे.

भगवंताच्या या भाष्यावर ते नवनारायण विचारू लागले की, "कलियुगात जनकल्याणाच्या, भक्तकल्याणाच्या हेतुस्तव तुम्ही ठरविलेल्या जन्मस्थितीत आम्ही कोणत्या स्थानी प्रकट व्हावे याचीही रूपरेषा आम्हांस सांगावी." त्यावर भगवंत उत्तरले, "पराशरपुत्र महर्षी व्यासांच्या मुखातून झालेली भविष्यवाणी खरी ठरणार आहे. हे असेच घडणार याची त्यांनी कृतयुगातच जाणीव करून दिली होती. वास्तव असे आहे की युगनिर्मितीच्या प्रक्रियेसाठी पूर्वी ब्रह्मदेवाच्या तेजापासून अठ्यांशी सहस्त्र ऋषींच्या तेजाची निर्मिती झाली होती. पण त्याचा विनियोग होत असताना त्यापैकी काही अंश वातावरणात कुठे कुठे पडून आहे. अर्थात ते तेज तसेच सुप्त अवस्थेत पडून न राहता सचेतन होणे अवश्यक आहे. 'कवी' कृषींनी मच्छिंद्र म्हणून जन्म घ्यावयाचा आहे. त्याचे विश्लेषण भगवंत सांगू लागले. उपरिचर वसू नामक ऋषी विमानाने आकाशमार्गे भ्रमण करीत असताना त्यांच्या दृष्ठीस उर्वशी ही देवांगना पडली आणि तिच्यावर मोहित झालेल्या वसूचे वीर्यस्खलन झाले. ते भूमी वर पडतांना त्याचा काही अंश यमुना नदीच्या जलप्रवाहात पडला आणि काही अंश शेतामधल्या द्रोणाकृती पर्णात आणि द्रोणाचार्यांचा जन्म झाला. पण पाण्यात पडलेल्या वीर्याचा अंश एका मत्स्यीने अन्न म्हणून सेवन केला आहे. तेथे तिच्या उदरांत ते तेज अस्तित्वात आहेच. 'कवी' नारायणाने स्वतः जीवात्म्याच्या स्वरूपात प्रवेश करून यथावकाश प्रकट व्हावे आणि मत्स्यीच्या पोटी जन्म घेतल्यामुळे मच्छिंद्र नाम धारण करावे. श्री शिवशंकाराने कामदेव मदनाच्या प्रमादाची शिक्षा म्हणून त्याला आपल्या भालावरील तृतीय नेत्रातून अग्नीशलाका सोडून त्याचे दहन केले होते. अग्नीने त्या वीर्याचा काही अंश प्राशन करून उदरात साठवला आहे. पण अग्नीच्या रूपातच त्याचे सूक्ष्म अस्तित्व आहे. "अंतरिक्ष" ऋषींनी या अस्तित्वाच्या रूपातून देहधारणा करावी. यज्ञाच्या अग्नीकुंडातून जन्मास येऊन जालंधर नावाने कलीयुगात आपले स्थान निश्चित करावे. कुरुवंशीय जनमजेय राजाच्या कुळात बृहद्रथ नामक महापराक्रमी राजा जन्मणार आहे, आणि आपले कर्तुत्व सिद्ध करण्यासाठी तो महायज्ञ करील. त्या समयी यज्ञकुंडातून अग्नी गर्भ बाहेर टाकील, अग्नी ज्वालेतून जन्म झाल्यामुळे जालिंदर नावाने प्रसिद्धी पावेल.

ब्रह्मविर्याचा काही भाग रेवा नदीच्या तीरावरील रेतीमध्ये पडला आहे. त्यातून चमसाने रेवणसिद्धी नामाने प्रकट व्हावे. त्याच ब्रह्म विर्याचा काही भाग पद्मिनी नामक सर्पिणीच्या माथ्यावर पडलां असतां तिने भक्षरूपाने गिळला आहे. तिच्या उदरातील अंड्यात ते तेज सुरक्षित आहे. यथावकाश त्या अंड्यातून अविर्होत्र नारायण नागनाथ नावाने अवतार घेणार आहे, याची जाणीव झाल्यामुळे जनमजेय राजाच्या नागसत्र यज्ञापासुन तिचे रक्षण करण्याच्या उद्देशाने अस्तिक ऋषींनी, त्या सर्पिणीला विशाल अशा वटवृक्षाच्या ढोलीत लपवून ठेवले आहे. अविर्होत्राने त्या अंड्यात प्रवेश करून वटसिद्धीनाथ नावाने प्रकट व्हावे.

त्यानंतरचा क्रम 'हरी' नारायणाचा मच्छिंद्रनाथ तीर्थयात्रा करीत असताना बंगालमध्ये येतील, आणि भक्त कल्याणाच्या शुद्ध हेतूने संततीची अपेक्षा करणाऱ्या एका ब्राहमण महिलेला पुत्रलाभास्तव विभूती देतील. पण गैरसमजातून आणि गफलतीमुळे ती विभूती उकिरड्यातील गाईच्या शेणावर फेकली जाईल. 'हरी' नारायण त्या विभूतीच्या माध्यमातून जन्मास येईल, आणि 'गोरक्ष' नामधारण करील.

दक्षकन्या पार्वतीच्या स्वयंवरानिमित्त देव, दानव, इंद्र, ब्रह्म वगैरे सर्वजण समारंभ प्रसंगी उपस्थित होते. तेव्हा पार्वतीचे लावण्य पाहून ब्रह्मदेव कामविव्हल झाले आणि त्यांचा वीर्यपात झाला. भर सभेत खाली पायाजवळ वीर्यपतन झाल्याने लाज्जीत झालेल्या ब्रह्मदेवाने इतरांच्या नकळत ते वीर्य हळूच टाचेने रगडून पुसण्याचा प्रयत्न केला. त्यामुळे विर्यबिंदू छिन्नविच्छिन्न होऊन त्याचे साठ सहस्त्र भाग झाले. त्यामधून साठ सहस्त्र वालखिल्य ऋषी निर्माण झाले. परंतु काही भाग केरकचऱ्यात समाविष्ठ झाल्यामुळे गंगेच्या पाण्यात फेकण्यात आला. तो दर्भामध्ये अडकून राहिला असून पिप्पलायनाने त्यात संचार करून चर्पटी नावाने अवतार घ्यावा.

सुर्यानारायाणाचा विर्याचा एक भाग आकाशातून धरणीवरील एका कुंभात पडला होता, त्यापासून अगस्तीने जन्म घेतला. एक भाग कैलिक ऋषीच्या आश्रमात, भिक्षापात्रात पडला असता कैलिक ऋषींना त्याचे उज्वल भवितव्य अंतर्ज्ञानाने आकलन झाले. त्या भिक्षापात्रात म्हणजे भर्तरीत त्यांनी त्याचे काळजीपूर्वक जतन केले. त्यात दुर्मिलाने संचार करून भर्तरी नाव धारण करावे.

हिमालय पर्वतावरील अरण्यात एक महाकाय हत्ती निद्रित झाला होता. सरस्वतीच्या अप्रतिम सौंदर्याने मोहित होऊन कामविव्हल झालेल्या ब्रह्मदेवाचे विर्यपतन होऊन काही भाग त्या हत्तीच्या कानात पडला आहे. जो भाग धरणीवर पडला होता, त्यावरून एक व्याघ्र चालत जात असताना त्या वाघाच्या पंज्याला चिकटलेल्या वीर्याशातून अत्री कृषींचा जन्म झाला. परंतु हत्तीच्या कानातील विर्यांश तसाच आहे त्यात प्रबुद्धाने संचार करून कर्ण कानीफ नावाने विख्यात व्हावे.

या व्यतिरिक्त गोरक्ष नदीकाठी बसून संजीवनी मंत्र पठण करीत असताना चिखलाचा पुतळा बनविल, त्या अचेतन पुतळयात संजीवनी प्रभावाने विष्णू विर्याचा संचार होताच करभाजनाने प्रवेश करून गहिनी नावाने देह धारण करावा. एकूणच कलीयुगातही जगरहाटी सुख समृद्धीत असावी. काही विपरीत होऊन क्लेशकारक स्थिती निर्माण होऊ नये. यासाठी भगवंताची इच्छा पूर्ण करण्यासाठी त्या निमंत्रित महाऋषींनी सहर्ष होकार दिला. सर्वांच्या शंका निरसन झाल्याने, समाधानी होऊन सार्वजण निघाले. नऊ नारायण मंदराचल (मेरू पर्वत) पर्वत शिखराकडे गेले. ह्या स्थानी शुक्राचार्यांनी समाधी घेतली होती. तेथेच या नव नारायणांनी योग ध्यानस्त होऊन समाध्या घेतल्या आणि योग्य समयांची प्रतीक्षा करू लागले.

कालपरत्वे भगवंताच्या मुखातून व्यक्त झालेले भाकीत तंतोतंत खरे ठरले, ते असे; यमुनेच्या डोहात ज्या मत्स्यीने वसुवीर्य भक्षण केले, तिच्या उदरात कविनारायणाने संचार केला. गर्भवृद्धीकाल पूर्ण होताच मत्स्येने अंडे घातले. ज्या अंड्यात कविनारायणाने अवतार घेतला होता ते डोहाच्या कडेला येऊन राहिले. योगायोगाने त्यावेळी कैलासावर एक घटना घडली. पार्वती (अपर्णा) शंकराजवळ हट्ट धरून बसली होती. "प्राणनाथा! आपण जो पवित्र मंत्र पठाण करून

ध्यान साधना करीत आहात, तो मंत्र मला सांगून अनुग्रह देण्याची कृपा करावी" त्यावर श्रीशंकर म्हणाले, "उमा, मी तुला अवश्य मंत्र उपदेश करीन, तथापि त्यासाठी शांत, एकांत असणारी आगळी वेगळी जागा असल्यास एक चित्ताने उपदेश करता येईल.

"आपण धरतीवरील एकांत स्थानी जाऊ." असे अर्पणा म्हणली. त्यानंतर शिवपार्वती वसुंधरेवरील एकांत स्थानाचा शोध घेत यमुनातीरी येऊन विसावले. तेथे मनुष्याचा वावर नव्हता. निःशबद्ध एकांताची प्रचीती आल्यामुळे त्यांना ते स्थान आवडले. भगवान शंकराने आसनस्थ होऊन पार्वतीला मंत्रोपदेश केला. तो उपदेश मत्स्य गर्भावस्थेत असलेल्या मच्छिंद्राने श्रवण केला. केवळ श्रवणच केला नाही तर ग्रहणसुध्दा केला. त्यामुळे सज्ञान अवस्था प्राप्त झाली. मी तु पणाचा भेद सरला सर्व ठिकाणी एकाच शाश्वत ब्रह्मचैतन्य उत्पन्न झाले.

श्रीशंकराने पार्वतीस विचारले, "अपर्णा ! आता हा मंत्र त्याच्या फलश्रुतीसह मला म्हणून दाखव आणि त्याचा अर्थ विषद कर पाहू"

त्याक्षणी उभयता उमा महेशांना थक्क करणारा चमत्कार घडला. पार्वतीने काही उच्चारण्यापुर्वीच गर्भावस्थेतील मच्छिंद्र म्हणाला, "हे देवा आदिनाथा! मंत्र ग्रहण करताच ब्रह्म साक्षात्कार झाला आहे. सर्व चराचरात ब्रह्मचैतन्य भरलेले आहे. ब्रह्मापासून भूमीपर्यंत सर्वत्र, मुळ स्वरूपातील चैतन्य एक आहे. सुवर्णापासून अलंकार बनविले तरी त्याचे मूलद्रव्य सुवर्णच आहे"

अशा निःशबद्ध एकांती कोण बोलले याचे आश्चर्य वाटून श्रीशिवाने अविश्वासाने त्या जलडोहाकडे दृष्टी वळवली असता, तेथे गर्भावस्थेत असलेल्या कविनारायणाला ओळखले. अत्यंत समाधानाने ते म्हणाले, "कविनारायणा! आपण येथे आहात? प्राब्ध योगाने माझा मंत्रोपदेश तुला प्राप्त झाला, हे अति उत्तम झाले महाराजा, तूझा जन्म झाल्यानंतर बद्रिकाश्रमात यावेस, तेथे मी तुला दत्तात्रेयांकरवी अनुग्रह देऊन मंत्रोपदेश करवीन आणि सर्व चीन्हयुक्त लेण्यांनी तुला अलंकृत करीन.'' असे म्हणून शिवपार्वती कैलास पर्वतावर निघून गेले. यमुनेच्या जलात मत्स्यीच्या उदरात मच्छिंद्र सातत्याने मंत्र घोकीत होता. पूर्ण दिवस भरताच मत्स्यी पाण्याच्या कडेला अंड घालून खोल पाण्यात निघून गेली.

काही कालांतराने तेथे बगळयांचा थवा मासे खाण्यासाठी उतरला असता त्या अंड्याकडे त्यांचे लक्ष वेधले गेले. सर्व बगळे धावले आणि अंडे खाण्यासाठी त्यावर चोचीने प्रहार करू लागले. त्यामुळे ते जमिनीच्या काठावर ढकलले जाऊन फुटले, आणि त्यांमधून सूर्यासारखे तेजस्वी बालक प्रकट होऊन आकांत करू लागले. त्याच्या रडण्याचा आवाज ऐकून बगळे घाबरून उडाले, यमुनातीरावर मत्स्यीच्या अंड्यातून मच्छिंद्र नामक अर्भकाच्या रुपाने तेजस्वी अवतार जन्मला. सारे काही भगवंताच्या नियोजनाप्रमाणे होत आहे याची प्रचिती स्पष्ट झाली.

काही काळाने कामीक नावाचा कोळी त्याठिकाणी मासे पकडण्यासाठी आला असता त्याची नजर त्या तेजेस्वी बालकावर पडून त्याच्या अंतःकरणात माया उत्पन्न झाली. कनवाळू वृतीचा तो कामिक कोळी चिंताग्रस्त झाला. गोजिरवाणा बाळ आहे. येथे एकटाच आहे. कोणी तरी हिंस्त्र श्वापद त्याला खाऊन टाकील. की करावे? कामिकाची द्विधावस्था पाहून देववाणी झाली. "धीवर कामिका! या बालकास घरी नेऊन त्याचे पालन पोषण कर. हे दिव्य बालक

म्हणजे मत्स्यीची  अंड्यातून जन्म घेतलेला साक्षात कविनारायण आहे. मत्स्याच्या पोटी जन्मला म्हणून त्याचे नाव मत्स्येंद्र (मच्छिंद्र) असे ठेव. पुढे हा फार मोठा महायोगी होऊन त्रिखंडात किर्तीवान होणार आहे. जा! निःसंशय होऊन या बालकाचा सांभाळ कर. तुझे कल्याण होणार आहे”

देववाणी ऐकून कामिकाने प्रेमभराने बाळाला उचलून छातीशी धरले. दुग्धपत्रात तूप साखर पडून अविट गोडवा निर्माण व्हावा, तसे त्याचे मन मधुर आनंदाने भरून गेले. काबाड कष्ठ करून त्रासलेल्या दारिद्र्याचा भाग्योदय होऊन हत्तीने त्याच्या गळ्यात राजमाला घालवी आणि तो राजपदी विराजमान व्हावा असे वाटले. साक्षात सुर्यानारायाणाने पोटी जन्म घेऊन निपुत्रिकाची दुःखांधार काजळी नाष्ठ केली. असे वाटले. एक एक पै कमविण्यासाठी कष्ठ करून प्राण मेटाकुटीस आला असताना अचानक अमृतकुंभ हातात आल्यानंतर व्हावा तसा अत्यानंद झाला. बाळाला स्वच्छ करून कामिक आनंद लाहरीवर तरंगत घरी आला. जीवनसाथी पत्नीच्या मांडीवर बाळाला ठेऊन म्हणाला, “प्रिये शारद्वते! हा बघ आपल्या वंशाला कुलदीपक झाला, जसा गंगेच्या पाण्यात सूर्यपुत्र कर्ण राधामातेला सापडला, तसा हा मला यमुना नदीच्या जलात सापडला.” सूर्यपुत्र कर्णाने जसा महापराक्रमी, महारथ्यांचा महारथी होऊन सर्व क्षत्रियांना आव्हान दिले. त्यापेक्षाही हा अधिक पराक्रमी होऊन याची त्रिलोकात किर्ती दुमदुमणार आहे. अहाहा! आता आपले दैन्य सरले आता आपला भाग्योदय झाला.

अत्यानंदीत होऊन पती जे बोलत आहे ते ऐकून शारद्वताही अर्थातच आनंदित झाली होती. त्या नवजात तेजस्वी आणि गोंडस बाळाला ह्रदयाशी धरताक्षणीच तिच्या मातृह्रदयातील ममता, जन्मजात वात्सल्य गहिवरले. तिच्या स्तनातून दुग्धधारा नव्हे तर अमृतधाराच जणू स्त्रवू लागल्या. अत्यानंदाने बाळ डोळे मिटून स्तनाला लावला. कवीनारायण मनुष्य योनीमधील मच्छिंद्ररुपात दुग्धपान करू लागला. शारद्वता मातेचे अत्यानंदाने भावसमाधी लागली. चिमुकला बाळ पोटभर दुध प्राशन करून शांतपणे पहुडला. नंतर तिने त्याला गरम पाण्याने स्नान घालून नटवून, पाळण्यात घालून झोके देत अंगाई गाऊ लागली. बाळ समाधानाने झोपी गेले. शारद्वता अपत्य सुखापासून वंचित होती, अनपेक्षितपणे तिची इच्छापूर्ती झाल्यामुळे ती कृतकृत्य झाली होती. बाळ मच्छिंद्राच्या संगोपनात या दांपत्याने  कुठलीच कसर ठेवली नाही. लाड आणि माया ममतेच्या सुखी वातावरणात मच्छिंद्र पाच वर्षांचा झाला.

एके दिवशी पिता कामिक म्हणाला, “बाळ मच्छिंद्र! आज आपण दोघे यामुनाच्या तीरावर जाऊया. त्यावर, “अवश्य पिताश्री” असे मच्छिंद्र उत्तरला, मग दोघे पितापुत्र यमुनेकाठी आले. मच्छिंद्र पाण्याच्या काठाजवळ माशांच्या टोपली जवळ बसला. कमिक पाण्यात जाले टाकून मासे पकडून काठावर फेकू लागला. मासे पकडण्यात व्यस्त असलेला कामिक मच्छिंद्रास म्हणाला, “मासे गोळा करून टोपलीत साठव.” पण इथे उलटा प्रकार घडला. पाण्याबाहेर फेकलेले तडफडणारे मासे पाहून मच्छिंद्र कळवळला, त्याच्या मानत आले; अरेरे! हा तर माझ्या मातृ कुळाचा घात होत आहे. मातृ कुळाचे रक्षण न करता आपण नुसतेच पाहत राहणे हे पुत्र धर्माला शोभणारे नाही. पूर्वी आस्तिक ऋषींनी आपल्या तपोबलाने जनमजेय राजाच्या सर्पसत्रापासून नाग कुळाचे रक्षण केले होते. मला ही तसेच केले पाहिजे. असा विचार करून तो चपळाईने एक एक मासा गोळा करून पाण्यात सोडू लागला. त्याचा पालनकर्ता; कामिक मासे पकडण्यात दंग होता आणि मच्छिंद्र ते मासे पुन्हा पाण्यात सोडण्यात दंग होता. बऱ्याच वेळानंतर कामिकाचे टोपलीकडे कडे लक्ष गेले तर टोपली रिकामीच दिसली, मच्छिंद्रकडे पाहतोय तर हा अत्यंत चपळाईने, टोपलीत

ठेवण्यासाठी फेकलेले मासे पुन्हा पाण्यात सोडण्याची घाई करीत आहे. जाळे फेकण्याच्या आणि ते ओढण्याच्या प्रक्रियेने दमछाक झालेल्या कामिकाची सगळी मेहनत वाया गेल्यामुळे तो अतिशय रागावला. पाण्यातून बाहेर आल्यावर त्याने रागाच्या भरात एक सणसणीत चपराक मच्छिंद्राच्या गालावर मारली. “मूर्खा! मी तिथे घाम गाळतोय ते मासे पकडण्यासाठी आणि तू पुन्हा पकडलेले मासे पाण्यात सोडत आहेस? मासे पकडण्यासाठी किती कष्ट पडतात याची जाणीव आहे का तुला? असे करशील तर काय खाशील, भिकाऱ्या सारखा भिक्षा मागशील काय?

गाल चोळता चोळता मच्छिंद्र विचार करू लागला, “भिक्षान्न हेच पवित्र अन्न आहे. त्यात काही दोष नाही. एक प्रकारे कामिकाने केलेला हा अनमोल उपदेशच आहे. आता यापुढे भिक्षा मागूनच आपली उपजिविका करावी” कामिक धीवर पुन्हा नदी पात्रात उतरला असता, मच्छिंद्र त्याची नजर चुकवून पळला.

अर्थात हे सारे विधीलीखीताप्रमाणे घडत होते.

मजल दमजल करीत तपश्चर्येसाठी सुयोग्य आणि पावन जागा शोधत शोधत तो उत्तर दिशेला बद्रीकावनात पोहोचला. तेथे त्याने अद्वैत वनात एका लोखंडी खिळयावर पायाचा अंगठा ठेवून केवळ वायू भक्षण करीत, सूर्याकडे एकटक पाहत आणि मुखाने हरीनाम घेत बारा वर्षे खडतर तप केले. देहाची अवस्था तर शुष्क सापळयासारखी झाली होती. डोळयांची बुबुळे गारगोटीसारखी झाली होती.

त्यावेळी श्री शिवाच्या दर्शनासाठी श्री दत्तत्रेय बद्रीकाश्रमी आले.

दत्तगुरु मंदिरात उभे राहून श्री शंकराची प्रार्थना करू लागले. उमाराय, दक्षजामाता, करूणालया, दिगंबरा, आदिपुरुषा, कामांतका, फणिवेषटका, रुंडभूषणा, कैलायनायका, अपर्णानिधाना, वृक्षभारोहणा, दानावांतका, देवाधीशा, उमाकांता, प्रलयरुद्रा, त्रिपुरांतका, शूळपाणी, शंकरा, शिवा, सदाशिवा, पंचवक्रास, त्रिनयना, भस्मधारणा, नरकपाळा, नीलकंठा... अशा अनेक नावांनी विनम्रपणे प्रार्थना केली असता श्री शंकर प्रसन्न होऊन प्रकट झाले. दोघेही एकमेकांना भेटून क्षेमकुशल विचारते झाले. औपचारिक पाहुणचारादी विधी झाल्यानंतर श्री दत्तात्रेयांनी बद्रिकाश्रमात अरण्य म्हणजेच अद्वैतवन पाहण्याची मनीषा व्यक्त केल्यावरून दोघेही अरण्यात गेले.

खरं तर मच्छिंद्राची भेट घडणार होती म्हणूनच अशा प्रकारची मनोकामना श्रीदत्तात्रेयांच्याठायी उत्पन्न झाली. मनासारखे घडून येत आहे, हे जाणून श्रीशिव आनंदित झाले. अरण्यशोभा दाखविण्यासाठी बहाण्याने श्री दत्त्त्रेयांना योग्य स्थळी घेऊन निघाले.

फलश्रुती: या अध्यायाच्या पठणाने संबंधबाधा नाहीशी होते.